**मौ. मंगरूळ  व मौ. जगळपूर ता.जळकोट जि. लातूर येथे प्रत्येकी एक याप्रमाणे एकूण ०२ नवीन श्रेणी १ पशुवैद्यकीय दवाखाना स्थापन करणे व विविध संवर्गातील प्रत्येकी एक याप्रमाणे एकूण ०६ नवीन पदे निर्मिती करणेबाबत.**

## महाराष्ट्र शासन

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : पवैद -२०२१/प्र.क्र.२६/पदुम-२**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ०२ जून, २०२३.

वाचा :- १) कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभागाचे शासन पूरक पत्र क्र. जिवायो- २०१०/ प्र.क्र २९१ / पदूम - ४, दि. ०१.०७.२०११

२) आयुक्त पशुसंवर्धन यांचे पत्र क्र.व्हिएचडी/४२/३४-३७/२०२१/पसं-१२, दि.०३.०१.२०२२

३) वित्त विभागाचे पत्र क्र. पदनि-२०२२/ प्रक्र.२८/आपुक दि.०६.०७.२०२२

४) वित्त विभाग पृष्ठांकन क्र. पदनि-२०२२/प्र. क्र.३७/आपुक दि.२६.०९.२०२२ अन्वये मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली दि.१६.०९.२०२२ रोजी आयोजित उच्च स्तरीय सचिव समितीच्या पार पडलेल्या सन २०२२ च्या चौथ्या बैठकीचे इतिवृत्त

**प्रस्तावना:-**

शेतकरी/पशुपालक यांच्याकडील पशुधनास पशुवैद्यकीय सेवा उपलब्ध व्हाव्यात म्हणून वाचा क्र.१ येथील दि.०१.०७.२०११ च्या शासन पूरक पत्रान्वये राज्यामध्ये नवीन श्रेणी-१ चा पशुवैद्यकीय दवाखाना स्थापन करण्यासाठीचे विविध निकष निश्चित करण्यात आलेले आहेत. श्रेणी-१ च्या पशुवैद्यकीय दवाखान्याची स्थापना करण्यासाठी पशुधन विकास अधिकारी, गट-अ, ०१ पद, व्रणोपचारक, गट-ड ०१ पद आणि परिचर, गट-ड ०१ पद अशा एकूण ०३ पदांचा आकृतीबंध देखील मंजूर करण्यात आलेला आहे.

दि.१६.०९.२०२२ रोजी पार पडलेल्या उच्चस्तरीय सचिव समितीच्या सन २०२२ मधील चौथ्या बैठकीत मौ. मंगरूळ  व मौ. जगळपूर ता.जळकोट जि. लातूर येथे नवीन श्रेणी-१ चा पशुवैद्यकीय दवाखाना स्थापन करण्यासाठी पशुधन विकास अधिकारी (गट-अ) ७ व्या वेतन आयोगातील वेतनश्रेणी (एस-२०, रू. ५६१००-१७७५००/-) या संवर्गाचे ०२ नियमित पद निर्माण करण्यास तसेच, ०२ व्रणोपचारक आणि ०२ परिचर अशा एकूण ०४ मनुष्यबळाच्या सेवा बाह्ययंत्रणेकडून घेण्यास उच्चस्तरीय सचिव समितीने मंजुरी दिली आहे. मौ. मंगरूळ  व मौ. जगळपूर ता.जळकोट जि. लातूर येथे नवीन श्रेणी-१ चा पशुवैद्यकीय दवाखाना स्थापन करणे तसेच सदरच्या स्थापनेसाठी पशुधन विकास अधिकारी, गट-अ चे ०२ नियमित पदे निर्माण करणे आणि व्रणोपचारक, गट-ड ०२ पद आणि परिचर, गट-ड ०२ पद या ०४ पदांच्या सेवा बाह्ययंत्रणेकडून उपलब्ध करून घेण्याच्या अनुषंगाने खालीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे:-

**शासन निर्णय :**

**मौ. मंगरूळ व मौ. जगळपूर ता.जळकोट जि. लातूर** येथे प्रत्येकी एक याप्रमाणे श्रेणी-१ चे ०२ नवीन पशुवैद्यकीय दवाखाने स्थापन करण्यास तसेच, सदरच्या दोन्ही दवाखान्यासाठी पशुधन विकास अधिकारी (गट-अ) ७ व्या वेतन आयोगातील वेतनश्रेणी (एस-२०, रू.५६१००-१७७५००/-) या संवर्गाचे ०२ नियमित पदे निर्माण करण्यास तसेच, ०२ व्रणोपचारक आणि ०२ परिचर अशा एकूण ०४ मनुष्यबळाच्या सेवा बाहययंत्रणेकडून घेण्यास याव्दारे, शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

**नविन पदनिर्मितीचा तपशिल**

| अ.क्र. | नव्याने निर्माण करावयाच्या पदाचे पदनाम | सातव्या वेतन आयोगानुसार वेतनश्रेणी | आकृतीबंधाप्रमाणे नव्याने निर्माण करावयाच्या पदाची संख्या | शेरा |
|---|---|---|---|---|
| १ | पशुधन विकास अधिकारी, गट-अ (पशुवैद्यकीय पदवीधर ) | एस-२०: (रू.५६१००-१७७५००/-) | ०२ | **नियमित नवीन पद निर्मिती** |
| २ | व्रणोपचारक, गट-ड | -- | ०२ | सदर ४ मनुष्यबळाच्या सेवा बाह्ययंत्रणेद्वारे उपलब्ध करून घेण्यात याव्यात. |
| ३ | परिचर, गट-ड | -- | ०२ | |

व्रणोपचारक व परिचर (गट-ड) या पदांच्या सेवा बाहययंत्रणेद्वारे उपलब्ध करून घेताना वित्त विभागाच्या दि.२७.०४.२०२२ च्या शासन निर्णयातील तरतूदींचे पालन करण्याची दक्षता घेण्यात यावी.

जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद, लातूर यांना उपरोक्त पदांचे वेतन व भत्ते आहरित करण्यासाठी याव्दारे, आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

नविन पदनिर्मितीच्या तसेच, बाह्ययंत्रणेद्वारे सेवा उपलब्ध करून घेण्याच्या अनुषंगाने वेतन व भत्त्यावरील खर्च खालील नमूद लेखाशिर्षांतर्गत खर्ची टाकण्यात यावा.

**लेखाशिर्ष**

मागणी क्र. डी-४,
२४०३,पशुसंवर्धन
१०१, पशुवैद्यकीय सेवा व पशुआरोग्य,
(०८), पंचवार्षिक योजनांतर्गत योजना,
(०८) (०१),राज्य योजनांतर्गत योजना - रूग्णालये व दवाखाने (अनिवार्य)
०१, वेतन
३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर)
संकेतांक २४०३०२२२

पशुधन विकास अधिकारी,गट-अ चे ०२ नवनिर्मित पदे भरण्यासंदर्भात आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी आवश्यक ती कार्यवाही तात्काळ करावी.

सदर शासन निर्णय वित्त विभागाचे अनौपचारिक संदर्भ क्र.२८७/आपुक दि.०९.०६.२०२२ यांच्या सहमतीने तसेच, वित्त विभाग पृष्ठांकन क्र.पदनि-२०२२/प्र.क्र.३७/आपुक, दि.२६.०९.२०२२ अन्वये निर्गमित करण्यात आलेल्या मा. उच्च स्तरीय सचिव समितीच्या दि.१६.०९.२०२२ रोजी पार पडलेल्या सन २०२२ च्या चौथ्या बैठकीत उक्त नवीन पद निर्मितीस प्रदान करण्यात आलेल्या मान्यतेअन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक सांकेतांक २०२३०६०२१४५८१२०३०१ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

CHANDRAKALA DEVRAM GAVIT

Digitally signed by CHANDRAKALA DEVRAM GAVIT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=db6efff5f9cbf5f55184ebe2b33934e3a1ad06cbfbad22ff0cbcf88f3c89e1e4, pseudonym=6AC1004D14020B1CF4AC873549BD26748DFEB090, serialNumber=B16E6FECB684A6091AF2BD729716C8F32004FE5EF01B9D220C1A6D0EDDC63E52, cn=CHANDRAKALA DEVRAM GAVIT
Date: 2023.06.02 14:59:11 +05'30'

**( चंद्रकला गावित )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत-**

१. मां. मंत्री (पशुसंवर्धन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई
२. आयुक्त पशुसंवर्धन, पशुसंवर्धन आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन, लातूर विभाग
४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, लातूर
५. प्रधान महालेखापाल (लेखापरिक्षा)-१/२ महाराष्ट्र, मुंबई/नागपुर.
६. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१/२ महाराष्ट्र, मुंबई/नागपुर
७. जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त, लातूर
८. जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, लातूर
९. जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद, लातूर
१०. वित्त विभाग (कार्यासन आपुक/व्यय-२) मंत्रालय, मुंबई
११. जिल्हा कोषागार अधिकारी, लातूर
१२. अवर सचिव (पदुम-३)/कक्ष अधिकारी (पदुम-१ व १६), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. निवड नस्ती/पदुम-२.